**जामगिरी पाणी पुरवठा योजना ता. चामोर्शी जि.गडचिरोली या योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देणे.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र. ग्रापापु-२०११/प्र.क्र.१२१/ पापु-१३**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : ४ जुलै, २०११**

**संदर्भ: १) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.किगका-१०९६/सीआर -२२९/(अ) पापु-१०,दि.७/८/१९९६**
**२)अधिक्षक अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.मजीप्रामंना/तांशा-३/३७२/२०११,दि.४/२/२०११**

**प्रस्तावना - जामगिरी पाणी पुरवठा योजना ता. चामोर्शी जि.गडचिरोली** या योजनेच्या **रुपये ५३.१६** लक्ष ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.१ येथील शासन निर्णयान्वये किमान गरजा कार्यक्रमाअंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी योजनेच्या खर्चात काही अपरिहार्य कारणामुळे वाढ झाली. त्यामुळे अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर यांचेकडून संदर्भाधिन पत्र क्र.२ अन्वये प्राप्त झालेल्या **जामगिरी पाणी पुरवठा योजना ता. चामोर्शी जि.गडचिरोली** या पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अदांजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:- जामगिरी पाणी पुरवठा योजना ता. चामोर्शी जि.गडचिरोली** या पाणी पुरवठा योजनेच्या ढोबळ **रु.५७.३३ लक्षच्या (रुपये सत्तावन्न लक्ष तेहेतीस हजार)** या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास व **रु.४.१७** लक्ष एवढया वाढीव रक्कमेस खालील अटीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) वर नमुद सुधारित किंमतीत उर्वरित कामे पूर्ण करावीत.
२) ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यांत येईल.
३) या योजनेस प्रशासकीय मंजुरी दिलेल्या मूळ शासन निर्णयात नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
४) ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी.संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग,चंद्रपूर यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आंत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र

जीवन प्राधिकरण विभाग, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पहाणी आयोजित करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

५) ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी ,योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

६) महाराष्ट्र ग्रामपंचायत कर फी नियम, १९६० मधील तरतदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल अशी बघण्याची जबाबदारी संबधित जिल्हा परिषदेची राहील.योजना स्वंयनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहिल.

२. या योजनेवर होणारा मुळ किंमतीपर्यंतचा म्हणजेच रु.५३.१६ लक्ष खर्च किमान गरजा कार्यक्रमांतर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागवावा.आणि सुधारित किंमतीतील वाढीव खर्च रु.४.१७ लक्ष महाजल खाली उपलब्ध होणाऱ्या निधीमधून राज्य/जिल्हा नियोजन मंडळ यांचे कडून उपलब्ध करुन घ्यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासननिर्णय क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११.७.२००१ मधील उपविभाग-३ मधील अ.क्र.६ समोरील परिच्छेद क्र.२७(अ) अनुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०७०४१४५३५८००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( राजेंद्र कुमटगी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१
२) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण , नागपूर विभाग, नागपुर
३) जिल्हाधिकारी, गडचिरोली.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली.
५) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, चंद्रपूर.
६) संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,महाराष्ट्र शासन,पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट,पुणे.
७) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, चंद्रपूर.
८) वरिष्ट भुवैज्ञानिक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, चंद्रपूर.
९) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१,/२ मुंबई./नागपूर.

१०) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
११) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई.
१२) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, चंद्रपूर.
१३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, गडचिरोली.
१४) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
१५) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) सर्व कार्यासने, पा. पु. व स्व. वि., मंत्रालय, मुंबई-३२.
१७) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१८) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१९) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
२०)निवडनस्ती कार्यासन पापु-१३.

**सहपत्र**

**शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. ग्रापापु-२०११/प्र.क्र.१२१/पापु-१३, दिनांक : ४ जुलै, २०११ सोबतचे प्रपत्र**

**(रुपये लाखात)**

| योजनेचे नांव | योजनेची मुळ मंजुर किमंत | | योजनेची सुधारित किमंत | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | किमान गरजा कार्यक्रमांतर्गत मंजुर तरतूद | एकूण | किमान गरजा कार्यक्रमांतर्गत मंजुर तरतूद | महाजल योजनेतंर्गत (राज्य/जिल्हा नियोजन मंडळ यांचेकडून) उपलब्ध तरतूद | एकूण | एकूण वाढ |
| जामगिरी पाणी पुरवठा योजना ता. चामोर्शी जि.गडचिरोली | ५३.१६ | ५३.१६ | ५३.१६ | ४.१७ | ५७.३३ | ४.१७ |

( राजेंद्र कुमटगी)
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन